**सहायक वनसंरक्षक, गट-अ (कनिष्ठ श्रेणी)**
**पदस्थापनेत अशंत: बदल.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्रमांक : एमएफएस-२०१७/प्र.क्र.८०(२)/फ-८.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २१ ऑगस्ट, २०१७.

**संदर्भ :-** शासन आदेश महसूल व वन विभाग क्र.एमएफएस-२०१७/ प्र.क्र. २/फ-८
दि.११/०५/२०१७.

**शासन आदेश :**

वन विभागातील वनक्षेत्रपाल, गट-ब या संवर्गातील अधिकाऱ्यांना सहायक वनसंरक्षक, गट-अ (कनिष्ठ श्रेणी) संवर्गात पदोन्नतीने पदस्थापना देण्याबाबत संदर्भाधीन दि.११/०५/२०१७ अन्वये आदेश निर्गमित करण्यात आले आहेत.

२. सदरहू आदेशामध्ये अंशत: बदल करुन खाली दर्शविल्याप्रमाणे सुधारीत पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकाऱ्यांचे नाव व पदस्थापना | शासन आदेश दि.११ मे २०१७ अन्वये देण्यात आलेली पदस्थाना | सुधारीत पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | श्री.सुभाष रामशंकर पाटील, वनक्षेत्रपाल | उपसंचालक,(शिक्षण-१) वन प्रशिक्षण संस्था पाल (रद्द करण्यात येत आहे.) | सहाय्यक संरक्षक (मृदसंधारण व कॅम्पा), जळगाव |

३. उपरोक्त अधिकाऱ्याच्या पदोन्नतीने रिक्त होणाऱ्या पदावर नियंत्रण अधिकाऱ्यांनी रिक्त दाचा कार्यभार अन्य अधिकाऱ्यांकडे सोपविण्याची कार्यवाही करावी.

४. सदर नियुक्ती / पदस्थापना दिलेल्या अधिकाऱ्यास नियंत्रक अधिकाऱ्यांनी नवीन नियुक्तीच्या जागी हजर होण्यास तात्काळ कार्यमुक्त करावे.

तसेच, संबंधित अधिकाऱ्यास नवीन नियुक्तीच्या जागी हजर होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते नवीन नियुक्तीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले, याबाबत संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांनी शासनास anil.dhas@nic.in या ई-मेल संकेतस्थळावर त्वरीत कळवावे.

**५.** सदर शासन आदेश, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१७०८२११७४४०८४२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Atul Ashok Kode
Date: 2017.08.21 17:34:06 +05'30'

**( अतुल कोदे )**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य,नागपूर.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), नागपूर.
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण), पुणे
४) मुख्य वनसंरक्षक (प्रा.), नाशिक
५) संचालक, वन प्रशिक्षण संस्था पाल, जि. जळगाव
६) महालेखापाल,महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र १, मुंबई
७) जिल्हा कोषागार अधिकारी, जळगाव
८) मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव
९) मा.राज्यमंत्री (वने) यांचे खाजगी सचिव
१०) सचिव (वने) यांचे स्वीय सहाय्यक
११) संबंधित अधिकारी / प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), म.रा.नागपूर यांचे मार्फत
१२) वन विभागातील सर्व कार्यासने
१३) निवड नस्ती (फ-८ कार्यासन).